**सामाजिक न्याय विभाग, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, महिला व बालविकास विभाग, दिव्यांग कल्याण विभाग आणि आदिवासी विकास विभाग या विभागांतर्गत स्वयंसेवी संस्था संचलित अनुदानित संस्थामधील प्रवेशित विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱे परिपोषण अनुदान, निवासव्यवस्था, शैक्षणिक व भौतिक सोयी-सुविधा इत्यादी बाबींची तपासणी करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२४/प्र.क्र.६२/शिक्षण-२**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १६ ऑगस्ट, २०२४.

**वाचा:-**

१. शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतीक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग क्र. व्हीजे डब्ल्यु-१०९०/ प्र.क्र.२२/प्रस्ताव-१/मावक-६, दिनांक २४.०९.१९९१
२. शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतीक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग क्र. व्हीजे डब्ल्यु-१०९०/ प्र.क्र.२२/प्रस्ताव-१/मावक-६,दिनांक ०९.१०.१९९१
३. शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतीक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग क्र. व्हीएएस -१०९४/ प्र.क्र.१७६/ मावक-६, दिनांक २५.०७.१९९६
४. शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतीक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२००१/ प्र.क्र.५९ /मावक-६, दिनांक २०.११.२००२
५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२००६/ प्र.क्र.११५/मावक-६, दिनांक ०९.०२.२००७
६. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२००६/ प्र.क्र.११५/मावक-६, दिनांक २७.०५.२००८
७. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२०१०/ प्र.क्र.०६/विजाभज-२, दिनांक २९.१२.२०११
८. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विभशा-२०१०/ प्र.क्र.०६/विजाभज-२, दिनांक ०१.०३.२०१६
९. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. बीसीएच-२०१८/ प्र.क्र.७९/शिक्षण-२, दिनांक ०३.०३.२०१९

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय विभागांतर्गत सुरू असलेल्या अनुसूचित जातीच्या अनुदानित आश्रमशाळा, मागासवर्गीय मुला-मुलींची अनुदानित वसतिगृहे, दिव्यांग कल्याण विभागांतर्गत अपंगांच्या अनुदानित विशेष शाळा/ कर्मशाळा, अस्थिव्यंग मुलांसाठी अनुदानित निवासी शाळा, बहिरे व मुके यांच्याकरिता असलेल्या अनुदानित निवासी शाळा, अंध मुलांसाठीच्या अनुदानित निवासी शाळा, इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण या विभागाच्या विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या अनुदानित प्राथमिक/ माध्यमिक/ उच्च माध्यमिक आश्रमशाळा/ ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी असलेल्या अनुदानित प्राथमिक आश्रमशाळा, आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळा तसेच महिला व बालविकास विभाग या

विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित संस्थामधील निवासी विद्यार्थ्यांना देण्यात येणारे परिपोषण अनुदान, विद्यार्थ्यांची निवासव्यवस्था, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शैक्षणिक व भौतिक सोयी-सुविधा इत्यादी बाबींची तपासणी करण्यासाठी शासनस्तरावर समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग, महिला व बालविकास विभाग, इतर मागास बहुजन कल्याण विभाग तसेच दिव्यांग कल्याण विभाग या विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फ़त चालविण्यात येत असलेल्या शासन मान्यता प्राप्त अनुदानित संस्थामधील निवासी विद्यार्थ्यांना देण्यात येणारे परिपोषण अनुदान, विद्यार्थ्यांची निवासव्यवस्था, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शैक्षणिक व भौतिक सोयी-सुविधा इत्यादी बाबींची तपासणी करण्यासाठी खालीलप्रमाणे आठ सदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सदस्य |
|---|---|
| १. | श्री. गिरीश दत्तात्रय महाजन,मा.मंत्री, (ग्रामविकास व पंचायतराज, पर्यटन) |
| २. | श्री. गुलाबराव रघुनाथराव पाटील, मा.मंत्री, (पाणीपुरवठा व स्वच्छता) |
| ३. | श्री. दादाजी दगडू भुसे मा.मंत्री, (सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) |
| ४. | श्री. संजय दुलीचंद राठोड,मा.मंत्री, (मृदा व जलसंधारण) |
| ५. | श्री. उदय रविंद्र सामंत, मा.मंत्री, (उद्योग) |
| ६. | श्री. धर्मरावबाबा भगवंतराव आत्राम, मा.मंत्री, (अन्न व औषध प्रशासन) |
| ७. | श्री. संजय बाबुराव बनसोडे, मा.मंत्री, (क्रीडा व युवक कल्याण,बंदरे) |
| ८. | श्री. अनिल भाईदास पाटील, मा.मंत्री, (मदत व पुर्नवसन, आपत्ती व्यवस्थापन) |

२. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे शासन मान्यता प्राप्त अनुदानित संस्थामधील निवासी विद्यार्थ्यांना देण्यात येणारे परिपोषण अनुदान, विद्यार्थ्यांची निवासव्यवस्था, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शैक्षणिक व भौतिक सोयी-सुविधा याबाबतची तपासणी समितीकडून करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०८१६१२२०२४६३२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY BALKRISHNA WAGHMARE

Digitally signed by VIJAY BALKRISHNA WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=f732949950f551f77488d97adf63b1be835f3a8db6f43554c249546fe680b629, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46023E62FC39A04680C22E8800D4B44643940A8C497578686120DE5067362274, cn=VIJAY BALKRISHNA WAGHMARE
Date: 2024.08.16 12:35:55 +05'30'

**( विजय वाघमारे )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई,
४. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,

५. सचिव, सा.न्या.व वि.स.विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई,
६. सचिव, दिव्यांग कल्याण विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,
७. सचिव, महिला व बालविकास विभाग, यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८. सचिव, इतर मागास व बहुजन कल्याण विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
१०. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे,
११. महालेखापाल (महाराष्ट्र-१/२) ( लेखा परीक्षा व लेखा व अनुज्ञेयता)मुंबई/नागपूर,
१२. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
१३. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण,
१४. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१६. निवडनस्ती, शिक्षण-२